सर्वोच्च न्यायालयाच्या न्यायालयीन निर्णयास अनुसरुन
दुय्यम न्यायालयातील सेवानिवृत्त न्यायीकअधिकाऱ्यांना
मा.न्या.पद्मनाभन यांच्या शिफारशी नुसार सुधारित वेतन
व अनुषंगिक भत्ते / लाभ देण्याबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**विधी व न्याय विभाग,**
**शासन परिपत्रक क्रमांक एचसीटी २०११/प्र.क्र.१००/का-३**
**मंत्रालय, मुंबई ४०० ०३२, दिनांकः २५ जुलै, २०११**

**पहा :-** **१.** क्र.एचसीटी २००९/प्र.क्र. १४१/का-३, दिनांक ५ जानेवारी, २०११
**२.** क्र.एचसीटी २००९/प्र.क्र. १४१/का-३,दिनांक ३० मार्च, २०१०

विधी व न्याय विभागाच्या क्र.एचसीटी २००९/प्र.क्र. १४१/का-३, दिनांक ५ जानेवारी, २०११ व दिनांक ३० मार्च, २०१० अन्वये मा.पद्मनाभन समितीने केलेल्या शिफारशी प्रमाणे दिनांक १/१/२००६ पूर्वी सेवानिवृत्त झालेल्या दुय्यम न्यायालयातील सेवानिवृत्त न्यायिक अधिकाऱ्यांना सुधारित सेवानिवृत्ती वेतन व अनुषंगिक लाभ / भत्ते देण्याबाबतचे आदेश निर्गमित करण्यात आले आहेत.

२. या सेवानिवृत्त न्यायिक अधिकाऱ्यांच्या निवृत्ती वेतनात सुधारणा करण्यासाठी सेवानिवृत्तीच्या वेळी त्यांनी धारण केलेले पद, निवृत्त होताना असलेले मूळ वेतन, वेतनश्रेणी त्यात झालेली सुधारणा याची माहिती घेऊन त्यानुसार या न्यायिक अधिकाऱ्यांचे निवृत्तीवेतन / कुटुंब निवृत्तीवेतन सुधारीत करण्याची कार्यवाही संबंधित न्यायिक अधिकारी ज्या कार्यालयातून सेवानिवृत्त झाले असतील त्या कार्यालयाकडून होणे अपेक्षित आहे. शेट्टी आयोगानुसार दुय्यम न्यायालयातील सेवानिवृत्त न्यायिक अधिकाऱ्यांच्या निवृत्तीवेतनात सुधारणा करताना संबंधित कार्यालयाकडून याबाबतची माहिती महालेखापाल कार्यालयाकडे पाठविण्यात आली होती व त्यानुसार महालेखापालांकडून सुधारीत प्राधिकारपत्रे प्राप्त झाल्यावर अधिदान व लेखा कार्यालयामार्फत कार्यवाही करण्यात आली होती. दिनांक ५/१/२०११ व दिनांक ३०/३/२०११ अन्वये निर्गमित करण्यात आलेल्या शासन निर्णयानुसार सेवानिवृत्त न्यायिक अधिकाऱ्यांच्या निवृत्तीवेतनात सुधारणा करण्यासंदर्भात त्याच प्रकारची कार्यवाही करुन दिनांक १/१/२००६ पूर्वी सेवानिवृत्त झालेल्या न्यायिक अधिकाऱ्यांना सुधारित सेवानिवृत्ती वेतन व अनुषंगिक भत्ते / लाभ देण्याची कार्यवाही करावी.

३. सदर आदेश वित्त विभाग/सेवा सेवा-४ कार्यासनाच्या क्र. सेनिवे२०११/दुय्यम न्यायालयाचे/ प्र.क्र.६४/सेवा-४, दिनांक ७/७/२०११ च्या पत्रास अनुसरुन निर्गमित करण्यात येत आहेत.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

**आपला,**

**(द.फु.गायकवाड)**
**अवर सचिव**

प्रति,
मा. राज्यपालांचे सचिव
मा. मुख्यमंत्र्यांचे प्रधान सचिव
मा. उप मुख्यमंत्र्यांचे प्रधान सचिव
मा. मंत्री (विधी व न्याय ) अणि त्यांचे स्वीय सहाय्यक
मा. राज्यमंत्री (विधी व न्याय ) अणि त्यांचे स्वीय सहाय्यक
महाप्रबंधक, उच्च न्यायालय, मुंबई
प्रबंधक, उच्च न्यायालय (मूळ शाखा), मुंबई
प्रबंधक, उच्च न्यायालय (अपील शाखा), मुंबई
महालेखापाल-एक /दोन (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र, मुंबई /नागपूर
महालेखापाल-एक /दोन (लेखापरीक्षा ), महाराष्ट्र, मुंबई /नागपूर
संचालक, लेखा व कोषागारे, मुंबई
अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई
निवासी लेखापरीक्षा अधिकारी, मुंबई
प्रमुख न्यायाधीश, नगर दिवाणी व सत्र न्यायालय, मुंबई
मुख्य महानगर दंडाधिकारी, मुंबई
प्रमुख न्यायाधीश, कौटुंबिक न्यायालय, मुंबई / पुणे /नागपूर /औरंगाबाद/अमरावती /अकोला/ठाणे.
मुख्य न्यायाधीश, लघुवाद न्यायालय, मुंबई
सर्व जिल्हा व सत्र न्यायाधीश
संचालक, न्यायीक अधिकारी प्रशिक्षण संस्था, नागपूर
सर्व जिल्हा कोषागार अधिकारी
धर्मादाय आयुक्त, मुंबई
विधी व न्याय विभागातील सर्व शाखा व कार्यासने
विधी व न्याय विभाग / का.७ (आवश्यक त्या कार्यवाहीसाठी)
वित्त विभाग ( सेवा-४)
सर्व मंत्रालयीन विभाग,
निवडनस्ती /का-३.